**नाशिक विभागातील तलाठी संवर्गातील अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ या कालावधीत मुदतवाढ देण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.आस्था-२०१८/प्र.क्र.१३०(भाग-३)/ई-१०**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : १ नोव्हेंबर, २०१८

**वाचा**:-१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.संकीर्ण-१००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि.२०.०३.२००६
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०५.०३.२०१८
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.आस्था-२०१८/प्र.क्र.१३०/ई-१०, दि.२५.०४.२०१८
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८
५) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र. मशा/१/आस्था/४/९५७५/२०१८/जा.क्र.२४६०, दि.२४.०९.२०१८

**प्रास्ताविक:-**

नाशिक विभागातील तलाठी संवर्गाच्या **२११८** पदांचा आकृतीबंध शासन निर्णय क्र.संकीर्ण-१००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८, दि.२०.०३.२००६ अन्वये मंजूर करण्यात आला आहे. या पदांपैकी **७५४** पदे ही अस्थायी असून त्यांना संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ या कालावधीत मुदतवाढ देण्यात आली होती. सदरची मुदत संपली असून आता वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ या कालावधीत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुषंगाने नाशिक विभागातील तलाठी संवर्गाच्या अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबतचा सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

**१.** नाशिक विभागातील तलाठी संवर्गातील अस्थायी पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नव्हते, असे विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रमाणित केलेले आहे. सबब, नाशिक विभागातील तलाठी संवर्गाच्या, पुढील परिशिष्टात दर्शविलेल्या एकूण ७५४ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

**परिशिष्ट**

| नाशिक विभाग | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **जिल्हा** | **मंजूर पदे** | **स्थायी पदे** | **अस्थायी पदे** | **खर्चाचे लेखाशिर्ष** |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | नाशिक | ५५० | ३३६ | २१४ | मागणी क्रमांक सी-१-२०५३-जिल्हा प्रशासन-०९४-इतर आस्थापना-०९४(०३) ग्राम अधिकारी-०९४-(०३)(०४) आयुक्त, नाशिक वेतने (२०५३ ०३२ २०१) |
| २ | धुळे | २३३ | १५० | ८३ | |
| ३ | नंदुरबार | २३० | १३२ | ९८ | |
| ४ | जळगांव | ५२२ | ३३६ | १८६ | |
| ५ | अहमदनगर | ५८३ | ४१० | १७३ | |
| | **एकूण** | **२११८** | **१३६४** | **७५४** | |

**२.** सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च उपरोक्त परिशिष्टातील स्तंभ क्र. ६ नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भ क्र. ४ वरील शासन निर्णयातील तरतुदींप्रमाणे सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता दि.२८.०२.२०१९ पूर्वी मिळविण्याकरीता आवश्यक ती कार्यवाही करावी.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : पदनि-२०१६ / प्र.क्र.८ /१६/ आ.पु.क., दि. ७ सप्टेंबर, २०१८ अन्वये सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०११७१२०४०६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2018.11.01 17:17:37 +05'30'

**(डॉ. संतोष भोगले)**
शासनाचे सह सचिव

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक

२) महालेखापाल-१ /२ (लेखा परीक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
३) जिल्हाधिकारी, नाशिक / धुळे / नंदुरबार / जळगांव / अहमदनगर
४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक / धुळे / नंदुरबार / जळगांव / अहमदनगर
६) वित्त विभाग ( आ.पु.क. / व्यय-९ कार्यासन), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
७) अवर सचिव (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवड नस्ती (कार्यासन ई-१०), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई